मंडळाचा विशेष निधी.

पूर्व विभागाच्या [विदर्भ] कारागृह
उद्योगाच्या आधुनिकीकरणासाठी योजना.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय, क्रमांक एमआरएस ०१९६/८१६/पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :- २७ मार्च, १९९७.

वाचा :- १] शासन निर्णय, गृह विभाग, समक्रमांक, दिनांक ६.२.१९९७.

२] शासनपत्र, गृह विभाग, क्र. आरईटी ०२९६/२०५६/९६-९७/अबोयुडो-१, दिनांक २० फेब्रुवारी, १९९७.

**शासन निर्णय** :- सन १९९६-९७ आर्थिक योजनेमध्ये विदर्भ वैधानिक विकास मंडळाच्या निधीमधून कारागृह उद्योगाच्या विकासासाठी पूर्व विभागातील कारागृहासाठी खाली नमूद केलेली यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी रु.१९.२० [रु. एकोणीस लाख वीस हजार फक्त] इतक्या रकमेस शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमआरएस ०१९६/८१६/पीआरएस-२, दिनांक ६.२.१९९७ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

| अ.क्र. | योजनेचे नाव | एकूण प्रस्तावित तरतूद. |
|---|---|---|
| १. | शेतीकाम जुन्या व निकामी झालेल्या ट्रॅक्टरच्या जागी एक नवीन ट्रॅक्टर ट्रॉलीसह खरेदी करणे. | ५.०० |
| २. | प्रशिक्षणासाठी नवीन यंत्रमाग उद्योगाचे आधुनिकीकरणासाठी नवीन यंत्रमाग आणि आधुनिक पध्दतीचे पॉवरलूम खरेदी करणे. | ८.०० |
| ३. | शेतीविषयक मालाच्या वाहतुकीकरिता पीकअप व्हॅन खरेदी [अकोला जिल्हा कारागृह]. | ५.०० |
| ४. | शेती उत्पादनाकरिता सबमर्सिबल पंप व ३ अश्वशक्तीचे मोटार पंप खरेदी करणे. | ०.७० |
| ५. | पिण्याच्या पाण्याची टाकी बांधणे. [यवतमाळ जिल्हा कारागृह]. | ०.५० |
| | एकूण | १९.२० लाख |

सन १९९६-९७ च्या योजनांतर्गत तरतुदीस प्रथम ९% व नंतर १०% अशी कपात लावण्यात आली होती. ती कायम ठेऊन आठमाही सुधारित अंदाजपत्रकात शासनपत्र, गृह विभाग, क्रमांक आरईटी ०२९६/२०५६/९६-९७/बोयुडो-१, दिनांक २०.२.९७ मध्ये रु.१९.२० लाखाची वाढीव तरतूद मान्य करण्यात आली आहे. त्यानुसार कारागृह महानिरीक्षक, पुणे यांना साधन सामुग्री वैधानिक विकास मंडळाच्या विशेष निधीतून गृह विभागातील कारागृहासाठी राखून ठेवलेल्या निधीपैकी

...२/-

रु.१९,२०,०००/- [रु. एकोणीस लाख वीस हजार फक्त] इतक्या खर्चास मंजूर शासन मंजुरी देण्यात येत आहे.

याबाबतचा खर्च मुख्यलेखाशिर्ष "२०५६" तुरुंग-१०१-सहा, कारागृह उद्योगाच्या विकास योजनांतर्गत" या खाली सन १९९६-९७ याकरिता आठमाही सुधारित अंदाजपत्रकात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. यु.क्र. ४६६/व्यय-८, दिनांक ३०.१.९७ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

[ वि. स. कांबळी ]

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

---

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
महालेखापाल [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
नियोजन विभाग [कार्यासन-१४११].
वित्त विभाग [अर्थसंकल्प-१०].
गृह विभाग [बोतुडो-२].
निवडनस्ती.

---